कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा सन २०१८-१९ चा अनुसूचित जाती प्रवर्गाचा अखर्चित निधी पुनरुज्जीवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देणे व रु.२१०१.४१५ लक्ष निधीचे वितरण करणे.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०७१९/प्र.क्र.१८२ (भाग-१)/१४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१९

**संदर्भ:-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.३-१ (महाराष्ट्र)/२०१५- M&T (आय ॲण्ड पी), दि. जून, २०१८

२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र/कृ.यां.उ.अ/२०१९-२०/गुनि-५/१९५/२०१८, दि.१९ जुलै, २०१९.

**प्रस्तावना-**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत- कृषी यांत्रिकीकरण उप- अभियान राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सन २०१८-१९ या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु.१४६०० लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी रु.२७९४.०३८लक्ष निधी आर्थिक वर्षअखेर अखर्चित राहिला. सदर निधी चालू आर्थिक वर्षात खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधिन जून, २०१९ च्या पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

उपरोक्त अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अनुक्रमे रुपये रु.३०२.०५३लक्ष, रु.१४३०.६०४ लक्ष व रु.१०६१.३८१ लक्ष निधीचा समावेश आहे. अनुसूचित जाती प्रवर्गाच्या केंद्र हिश्श्याच्या अखर्चित निधीपैंकी रु.१२९.१८९ लक्ष निधी कृषि आयुक्तालयाच्या PFMS बँक खात्यात जमा असून उर्वरित रु.१३०१.४१५ लक्ष निधी शासन कोषागारात जमा आहे. अनुसूचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा शासन कोषागारात जमा असलेला रु.१३०१.४१५ लक्ष व राज्य हिश्श्याचा रु.८०० लक्ष असा एकूण रु.२१०१.४१५ लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाचा अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१८-१९ या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.१३०१.४१५ लक्ष (अक्षरी रुपये तेरा कोटी एक लाख एकेचाळीस हजार पाचशे फक्त) व राज्य हिश्श्याचा रु.८०० लक्ष (अक्षरी रुपये आठ कोटी फक्त) असा एकूण रु.२१०१.४१५ लक्ष (अक्षरी रुपये एकवीस कोटी एक लाख एकेचाळीस हजार पाचशे फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७८९- अनुसूचित जाती उपयोजना<br>(००)(१३) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना)<br>(२४०१A३०५ ), ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७८९- अनुसूचित जाती उपयोजना<br>(००)(१४) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना)<br>(२४०१A३१४ ), ३३ अर्थसहाय्य |

३. उपलब्ध निधी फक्त अनुसूचित जाती/नवबौध्द लाभार्थ्यांसाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे .

८. सदर निधी सामाजिक न्याय विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४७/२०१९/व्यय-१, दि.२० सप्टेंबर, २०१९ अनव्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन वितरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०३११३०९५३८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN N PATIL

Digitally signed by KIRAN N PATIL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=657661007c4f6885bf8deae62f13606632589e592d8c18ce
b9a49bfd30471850, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=64a3950913946fa68fe576faead463fd8ae1e3844a82
0d921b663674927a476e, ou=AGRICULTURE DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KIRAN N PATIL
Date: 2019.10.31 13:12:48 +05'30'

**( डॉ. किरण पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,पुणे
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. आयुक्त, सामाजिक न्याय, पुणे.
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
७. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग,गोरेगाव (पूर्व) मुंबई- ६५.
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
११. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०.
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. अध्यक्ष,सर्व जिल्हा परिषदा

१४.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१५.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१६.वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१७.ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१९.मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२०.निवड नस्ती (कार्यासन -१४अे).